**मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून**
**अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**साईमाई सेवा संस्था,सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-सीसीएफ-२०२२/प्र.क्र.२०७/२५**
मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ एप्रिल, २०२३

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. पीडीसी-१०६९-१३५१४-बी, दि. २७/०८/१९६९

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. पीडीसी-१०६९/१३५१४-बी, दि. ०८/१०/१९७०

३) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५, दि.१७/९/२०१९

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन शुद्धीपत्रक, क्र. क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५, दि.२४/११/२०२२

**शासन निर्णय -**

मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीचे संपूर्ण नियंत्रण, व्यवस्थापन व प्रशासन मा. मुख्यमंत्री महोदय यांच्याकडे निहीत आहे. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून महाराष्ट्र-कर्नाटक सीमाभागातील ८६५ गावे यासह महाराष्ट्र राज्यातील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निम सार्वजनिक संस्था किंवा संघटना यांना, या निधीतून मा.मुख्यमंत्री यांच्या स्वेच्छानिर्णयानुसार अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने साईमाई सेवा संस्था, सी.बी.डी.,बेलापूर, नवी मुंबई या संस्थेस शाळेचे क्लासरुम डिजीटल करण्यासाठी रुपये २५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य याद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

२. साईमाई सेवा संस्था,सी.बी.डी., बेलापूर, नवी मुंबई या संस्थेस शाळेचे क्लासरुम डिजीटल करण्याकरिता निधी मंजूर करण्यात आला आहे. संस्थेस ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी संस्थेने एका वर्षात खर्च करावा आणि खर्चाच्या अनुषंगाने “सनदी लेखापाल” (Chartered Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र, निधी प्राप्त झाल्यानंतर एक वर्षात सादर करावे. तसेच सदर संस्थेने नियमानुसार लेखापरिक्षण करुन घेऊन लेखापरिक्षण अहवाल देखील शासनास सादर करावा.

३. सदर निधी वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५, दि.१८ एप्रिल, २०११ मधील तरतुदीस अनुसरुन मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या स्वीयप्रपंजी (PLA) लेखा खात्यामधून साईमाई सेवा संस्था, सी.बी.डी.,बेलापूर, नवी मुंबई या संस्थेच्या अभ्युदय को-ऑपरेटिव्ह बँक लि. शाखा-सीबीडी बेलापूर, नवी मुंबई खाते क्र. ०२२०१११०००३४२९३ मध्ये विहीत कार्यपद्धतीनुसार जमा करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय संदर्भाधीन दि. २७/०८/१९६९, दि ८/१०/१९७० , दि. १७/०९/२०१९ आणि दि. २४/११/२०२२ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार तसेच मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या मंजूरीअन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२८१७१७३५०५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POONAM APPASAHEB NIKAT

Digitally signed by POONAM APPASAHEB NIKAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=4244125d615d0ed721459edc809359f4ab75dd3e50a5a0a9a8c65e19e76ee1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D685FEFE26CBBD0A3DD72ECF2724309E44D5F2DB33F88465536810293EEA17B2, cn=POONAM APPASAHEB NIKAT
Date: 2023.04.28 17:26:05 +05'30'

**(पूनम निकत)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई

३) महालेखापाल, महाराष्ट्र (१/२), लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर

४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

५) निवासी लेखाधिकारी, मुंबई,

६) उप सचिव (कोषा प्र-५/ अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७) अधिक्षक, सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, पहिला मजला, लिली अपार्टमेंट, पारसी अग्यारी लेन, टेंभीनाका, ठाणे-४००६०१.

८) अध्यक्ष, साईमाई सेवा संस्था, सी.बी.डी.,बेलापूर, नवी मुंबई

९) निवडनस्ती. (का-२५).